उद्योग अधिकारी (प्रशासन) (गट-ब) या
संवर्गातील पदावरील पदोन्नती

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन आदेश क्रमांक : पदोन्न-१४१८/प्र.क्र.६९/उद्योग-३**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २१ सप्टेंबर, २०१८

वाचा -

उद्योग संचालनालयाचे पत्र क्र.उसं/आस्था-१/उ.अ.(तां)-उ.अ.(प्र.)/बैठक/२०१८/ बी-१०८४, दि.२६.०६.२०१८

**शासन आदेश :-**

उद्योग संचालनालयांतर्गत अधिक्षक (गट-क) (वे.श्रे.रु. ९३००-३४८०० + ग्रेड पे रु.४३००) पदावर कार्यरत असलेल्या खाली नमूद कर्मचाऱ्यांना उद्योग अधिकारी (प्रशासन) (गट-ब) (वे.श्रे.रु. ९३००-३४८०० + ग्रेड पे रु.४४००) या पदावर तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत आहे. पदोन्नतीनंतरची पदस्थापना पुढीलप्रमाणे अटींच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे.

**पदोन्नतीनंतरची पदस्थापना**

| अ.क्र. | अधिक्षकांचे नाव, ज्ये.क्र. , प्रवर्ग व कार्यालय | पदस्थापनेचे ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|
| १. | श्री.म.र.जाधव (खुला) (ज्ये.क्र.३) उद्योग संचालनालय, मुंबई | उद्योग अधिकारी (प्रशासन), उद्योग संचालनालय, मुंबई | रिक्त पदावर |

२. सदर पदोन्नत्या या आरक्षण अधिनियम २००१ प्रकरणी मा.उच्च न्यायालयात प्रलंबित असलेल्या याचिका क्र.२७९७/२०१५ मधील अंतिम निर्णयाच्या अधिन राहून करण्यात येत आहे.

३. सदर पदोन्नत्या महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधिन राहून करण्यात येत आहेत.

४. संबंधित अधिक्षक यांनी सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र. सीडीआर-१०८७/ १७८१/ ५०-अकरा, दि. २४.११.१९८८ नुसार पदोन्नतीच्या पदाचा कार्यभार स्विकारण्यापूर्वी मत्ता व दायित्वाबाबतचे विवरणपत्र विकास आयुक्त (उद्योग) उद्योग संचालनालय, मुंबई यांना सादर करणे आवश्यक राहील.

५. संबंधित अधिक्षक यांनी त्यांच्या सध्याच्या पदाचा कार्यभार विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांच्या आदेशानुसार अन्य कर्मचाऱ्याकडे सोपवून पदोन्नतीच्या पदावर तात्काळ रुजू व्हावे.

६. संबंधित अधिक्षक ज्या दिवशी पदोन्नतीच्या पदावर रुजू होतील त्या दिनांकापासून त्यांना पदोन्नतीविषयक लाभ अनुज्ञेय होतील.

७. विकास आयुक्त (उद्योग) यांनी संबंधित अधिक्षक यांना पदोन्नतीच्या पदावर रुजू होण्याच्या दृष्टीने तातडीने आवश्यक ती कार्यवाही करावी, त्याबाबतचा कार्यपालन अहवाल शासनास सादर करावा.

८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०९२११४३८२०७७१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Santosh Jagatrao Kale

Digitally signed by Santosh Jagatrao Kale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries, Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f2532e3222ba7f49d8a67dd10b00f555be263305 5b547af40ebd3801efd71800, cn=Santosh Jagatrao Kale
Date: 2018.09.24 15:34:56 +05'30'

**( संतोष ज.काळे )**
कक्ष अधिकारी

**प्रति,**

विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई

**प्रत**

१. मा.मंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव
२. मा.राज्यमंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव
३. प्रधान सचिव (उद्योग) यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक
४. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (*पत्राने)
५. उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग (१२/१६-ब), मंत्रालय, मुंबई.
६. महालेखापाल, (लेखा अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी
९. निवडनस्ती (उद्योग-३)